सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पास (MACP) रु.९२११.०० लाख इतक्या रकमेचा निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक- ०६१८ /प्र.क्र.१०३ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १२ सप्टेंबर, २०१८

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः बासप्र-२००८/प्र.क्र.४५/२१-स, दिनांक ०९.०५.२०११.
२) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांचे पत्र क्र.एमएसीपी/ पीसीयु/ लेखा/अनुदान मागणी/७३२/१८-१९, दि.०८.०८.२०१८
३) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांचे पत्र क्र.एमएसीपी/ पीसीयु/ लेखा/अनुदान मागणी/८११/१८-१९, दि.०७.०९.२०१८
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१८/ (प्र.क्र.१३/ २०१८)/ १७-स, दिनांक ०४ एप्रिल, २०१८.
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः बासप्र-०४१८/प्र.क्र.६५/२१-स, दिनांक २८ मे, २०१८.
७) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७.०७.२०१८
८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः पूरक-२०१८/प्र.क्र.३४/२०१८)/ १७-स, दिनांक ३० जुलै, २०१८.

प्रस्तावना :-

जागतिक बँकेच्या सहकार्याने राज्यामध्ये महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प (MACP) राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पास उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्पांतर्गत विविध समाविष्ट घटकांचा खर्च भागविण्यासाठी महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पास (MACP) सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनातील पुरक मागणीअन्वये मंजूर रु.९२११.०० लाख इतक्या रकमेचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सन २०१८-१९ करीता जागतिक बँक सहाय्यीत महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत (MACP) सहभागी असणाऱ्या खालील नमूद यंत्रणांना सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनातील पुरक मागणीद्वारे मंजूर राज्य हिश्श्याखाली रु.४३१.०० लाख व बाहय हिश्श्याखाली रु.८७८०.०० लाख असे एकूण रु.९२११.०० लाख (रुपये ब्यान्नव कोटी अकरा लाख फक्त) इतक्या रक्कमेचा निधी मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा-

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | **मागणी क्र.व्ही-२**<br>**मुख्य लेखाशिर्ष २४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम**<br>**(१९९), इतर अशासकीय संस्थांना सहाय्य**<br>**(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प**<br>**(०१)(०१) जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प**<br>**(राज्य हिस्सा)(कार्यक्रम) (२४३५ ००१७)**<br>**३२, अंशदाने** | **४३१.००**<br>**(रुपये चार कोटी एकतीस लाख फक्त)** |
| २ | **मागणी क्र.व्ही-२**<br>**मुख्य लेखाशिर्ष २४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम**<br>**(१९९), इतर अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य**<br>**(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प**<br>**(०१)(०२) जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प**<br>**(बाहय हिस्सा)(कार्यक्रम) (२४३५ ००२६)**<br>**३२, अंशदाने** | **८७८०.००**<br>**(रुपये सत्याऐंशी कोटी ऐंशी लाख फक्त)** |
| | **एकूण** | **९२११.०० (रुपये ब्यान्नव कोटी अकरा लाख फक्त)** |

३. उपरोक्त परिच्छेद क्र.२ येथे नमूद लेखाशिर्षाखाली चालू वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून मंजूर करण्यात आलेला रु. ९२११.०० लाख इतक्या रक्कमेचा निधी **(रुपये ब्यान्नव कोटी अकरा लाख फक्त)** महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत सहभागी विभागांच्या संबंधित अंमलबजावणी

यंत्रणांना पुढील तक्त्यातील विगतवारीनुसार उपलब्ध करुन देण्यात येत आहे:-

**(रुपये लाखात)**

| अ.क्र | **विभागाचे नाव** | **प्रकल्पांतर्गत अंमलबजावणी यंत्रणा** | **सन २०१८-१९ करिता मंजूर निधी** | **लेखाशिर्ष** | **नियंत्रण अधिकारी (क्ष)** | **आहरण व संवितरण अधिकारी (य)** |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| **(अ)** | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प-प्रोजेक्ट को-ऑर्डीनेशन युनिट (पी.सी.यु.), पुणे | ५२००.०० **(RTGS)** | २४३५ ००२६ | श्री. का.गो. वळवी उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई. | श्री. र.गं. बोड्डू कार्यासन अधिकारी, ( रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई |
| | | **एकूण (अ)** | **५२००.००** | | | |
| **(ब)** | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | १) प्रकल्प अंमलबजावणी कक्ष ( कृषि पणन), महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे (PIU - MSAMB) | ४३१.०० (RTGS) (राज्य हिस्सा) ५८०.०० (RTGS) (बाह्य हिस्सा) | २४३५ ००१७<br>२४३५ ००२६ | श्री. का.गो. वळवी उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ | श्री. र. गं. बोड्डू कार्यासन अधिकारी, (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |
| | | २) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे | ३०००.०० (RTGS) | २४३५ ००२६ | | |
| | | **एकूण (ब)** | **४०११.००** | | | |
| **एकूण (अ) + (ब)** | | | **९२११.००** | | | |

४. परिच्छेद क्र. ३ येथील तक्त्यातील “क्ष” आणि “य” मधील रकान्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाकरीता अनुक्रमे “नियंत्रण अधिकारी” व “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना रु.९२११.०० लाख (रुपये ब्यान्नव कोटी अकरा लाख फक्त ) निधी थेट अर्थसंकल्पीय प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत असून त्यांनी सदर निधी परि.क्र. ३ येथील तक्त्यामधील संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरित करावयाचा आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदर निधी परि.क्र.३ मधील स्तंभ क्र.३ येथील यंत्रणांना BDS / RTGS सुविधेव्दारे अदा करावेत.

५. या प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी NEFT/ RTGS सुविधेद्वारे प्रकल्पाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| Account Name | **Maharashtra Spardhaksham Krushi vikas Prakalpa - PCU, Pune** |
| Account No | **31467641885** |
| Bank Name | **State Bank Of India** |
| Branch | **Market Yard, Pune** |
| Address | **Near Shivaji Putala, Market Yard Pune - 411037** |
| Branch Code | **6117** |
| IFSC Code | **SBIN0006117** |
| MICR Code | **411002011** |

| | |
|---|---|
| Account Name | **Maharashtra Spardhaksham Krushi vikas Prakalpa - PIU (MSAMB), Pune** |
| Account No | **31516129521** |
| Bank Name | **State Bank Of India** |
| Branch | **Market Yard, Pune** |
| Address | **Near Shivaji Putala, Market Yard Pune - 411037** |
| Branch Code | **6117** |
| IFSC Code | **SBIN0006117** |
| MICR Code | **411002011** |

| | |
|---|---|
| Account Name | **Maharashtra Rajya Wakhar Mahamandal, Pune** |
| Account No | **31624278990** |
| Bank Name | **State Bank Of India** |
| Branch | **Market Yard, Pune** |
| Address | **Near Shivaji Putala, Market Yard Pune - 411037** |
| Branch Code | **6117** |
| IFSC Code | **SBIN0006117** |
| MICR Code | **411002011** |

६. महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प कार्यालयाच्या संदर्भांकित प्रस्तावाच्या अनुषंगाने अंमलबजावणी यंत्रणांनी प्रकल्पांतर्गत कामांकरीता मंजूर निधीच्या मर्यादेतच विनियोग करावा. तसेच प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांनी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात सदर प्रकल्पांतर्गत होणाऱ्या खर्चाची माहिती दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास निश्चितपणे सादर करावी. तसेच सदर रकमेचा विनियोग प्रकल्प कालावधी समाप्त होण्यापूर्वी म्हणजेच दिनांक ३१.१०.२०१८ पर्यंत पुर्ण होईल याची खबरदारी घ्यावी.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर निधीचा विनियोग प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांच्या/उप-घटकांच्याच (Components/Sub-components) अंमलबजावणीकरीता तसेच मंजूर खर्च मर्यादेमध्येच प्रकल्पांतर्गत विहित पध्दतीनेच करण्यात येत असल्याबाबतची खात्री सर्व नियंत्रण अधिकाऱ्यांनी करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांना सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रकल्प संचालकांनी त्रैमासिक निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (IUFR) जागतिक बँकेस विहित कालावधीत सादर करुन सदर रकमेची प्रतिपूर्ती मिळविण्याकरीता वेळोवेळी पाठपुरावा करावा.

८. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांनी प्रकल्पामध्ये सहभागी असलेल्या सर्व विभागांच्या यंत्रणांमार्फत होणारा खर्च प्रकल्पांतर्गत समाविष्ट घटकांवर तसेच मंजूर खर्च मर्यादेमध्ये प्रकल्पांतर्गत विहित पध्दतीनेच खर्च होत असल्याबाबत खात्री करावी. त्याचप्रमाणे संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी तसेच प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांनी प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांच्या/ उप-घटकांच्याच (Components/Sub-components) अंमलबजावणीमध्ये राज्य शासन, जागतिक बँक व लाभार्थ्यांच्या खर्चाच्या विहित वाटयाचे काटेकोर पालन होईल याची खबरदारी घ्यावी.

९. शासन निर्णयाच्या अनुषंगाने प्रकल्प संचालक (MACP), पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांनी आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात तसेच सदर रकमेचा विनियोग दिनांक ३१.१०.२०१८ पर्यंत पुर्ण होईल याची खबरदारी घ्यावी.

१०. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमुद करण्यात येत आहेत :

१) सदर खर्च वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सुचनांचे व वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल याचे काटेकोर पालन करण्याबाबत प्रकल्प संचालक यांनी दक्षता घ्यावी.

२) मंजूर निधी रु. २०३११.०० लाख.

३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% व त्यापेक्षा अधिक निधी खर्च झालेला आहे.

४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्याबाबत दक्षता घेतलेली आहे.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे, ही बाब लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असेल.

८) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग, दिनांक ३०.१०.२०१५ च्या शासन आदेशानुसार करावी, ही बाब लागू नाही. (जागतीक बँकेच्या खरेदीविषयक प्रक्रियेबाबतचे धोरण लागू आहे.)

९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करण्यात येईल.

११. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील मुद्दा क्रमांक ८ मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. परिशिष्टातील अन्य मुद्दे सदर प्रकरणी लागू होत नाहीत.

१२. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व नियोजन विभागाचे अनौसं क्र. १३३/१४३१ दि.२१/०८/२०१८ व वित्त विभागाच्या अनौसं ४४८/२०१८ व्यय-२ दि.३१/०८/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१२१६२२४५९८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.09.12 16:27:09 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
२) मा.मंत्री (कृषि / पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (कृषि/पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (कृषि व पणन/ पशुसंवर्धन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
६) आयुक्त (पशुसंवर्धन), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
८) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे
९) महासंचालक, वनामती, धरमपेठ, नागपूर
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
१२) विभागीय कृषि सहसंचालक,पुणे
१३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,(सर्व)
१४) उप-आयुक्त, पशुसंवर्धन, (सर्व)
१५) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी
१९) अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा/२२-स),स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२०) निवडनस्ती (२१-स).